ॲड श्री. जयसिंग देसाई व ॲड श्री. सुनिल डोमनिक गोन्सालवीस यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.

दहशतवाद विरोधी पथक, पो.स्टे. काळाचौकी, मुंबई येथील गु.र.क्र.११/२०१८ या गुन्ह्यामधून उद्भवणाऱ्या न्यायालयीन प्रकरणामध्ये नियुक्त करण्यात आलेल्या ॲड श्री. जयसिंग देसाई, सरकारी अभियोक्ता आणि ॲड श्री. सुनिल डी. गोन्साल्वीस, अतिरिक्त सरकारी अभियोक्ता यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एसपीपी-०९१८/प्र.क्र.३१३/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १५ नोव्हेंबर, २०१९

**संदर्भ** :- विधि व न्याय विभागाची अधिसूचना क्रमांक एसपीपी-१०१८/यु.ओ.आर.८३/डी-१४, दिनांक :- ३१.१२.२०१८

**शासन निर्णय :-**

दहशतवाद विरोधी पथक, पो.स्टे. काळाचौकी, मुंबई येथील गु.र.क्र.११/२०१८, या गुन्ह्याच्या सुनावणी दरम्यान विधि कामकाजाकरीता ॲड श्री. राजा ठाकरे यांना मदतनीस म्हणून सरकारी अभियोक्ता ॲड श्री. जयसिंग देसाई व अतिरिक्त सरकारी अभियोक्ता ॲड श्री. सुनिल डोमनिक गोन्साल्वीस यांची विधि व न्याय विभागाच्या शासन अधिसुचना दिनांक ३१.१२.२०१८ अन्वये नियुक्ती करण्यात आली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी सरकारी अभियोक्ता ॲड श्री. जयसिंग देसाई व अतिरिक्त सरकारी अभियोक्ता ॲड श्री. सुनिल डोमनिक गोन्साल्वीस यांना खालीलप्रमाणे फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रु.१०,०००/-
(रुपये दहा हजार फक्त)

ॲड श्री. जयसिंग देसाई व ॲड श्री. सुनिल डोमनिक गोन्साल्वीस यांना अपरिणामकारक सुनावणी फी, विचारविनियम फी व अन्य कोणतेही भत्ते अनुज्ञेय असणार नाहीत.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडुन प्रमाणित करुन घेण्यात यावेत. कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या दहशतवाद विरोधी पथकाचे लेखाशिर्ष बी-१, २०५५ पोलीस - (००)(१०१), गुन्हा अन्वेषण आणि दक्षता (००)(०५), दहशतवाद विरोधी पथक (२०५४५ ०५७१) - २८ व्यावसायिक व विशेष सेवा या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २५/१९/व्यय-७, दिनांक २८.०१.२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१११५१६५४५२४४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Neelam Girish Sangwai

Digitally signed by Neelam Girish Sangwai
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9bbc429d62201a67249f70e60acdfadbff901fbbbf45cc393dbd6aa91fbd6ca, serialNumber=81e4e52421d72a2ae32df6c7d06abb4e6a7b5820c3a929f328ad6c0dca4f38c7, cn=Neelam Girish Sangwai
Date: 2019.11.15 16:56:09 +05'30'

**( नीलम संगवई )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. अपर पोलीस महासंचालक, मुंबई, महाराष्ट्र राज्य, दहशतवाद विरोधी पथक
३. महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य,मुंबई / नागपूर .
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. विधि व न्याय विभागा (का-१४), मंत्रालय, मुंबई.
७. वित्त विभाग (व्यय ७), मंत्रालय, मुंबई.
८. ॲड श्री. जयसिंग देसाई, सरकारी अभियोक्ता.
९. ॲड श्री. सुनिल गोन्साल्विस, अतिरिक्त सरकारी अभियोक्ता
१०. निवड नस्ती/पोल-१०.